**दिवाणी न्यायाधीश, वरिष्ठ स्तर, सिन्नर, जि.नाशिक यांना कार्यालय प्रमुख व आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डीडीओ ०५२३/प्र.क्र.९४ /का.११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दि. ०८ मे, २०२३.

**वाचा:-**

१) शासन निर्णय,विधि व न्याय विभाग क्रमांक:-न्यायस्था ११२०/३७४/प्र.क्र.९०/का-११, दि.०९.११.२०२२.
२) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्रमांक:- पूरमा-११२२/प्र.क्र.१३५/का-११, दि.०९.०१.२०२३.
३) शासन अधिसूचना विधि व न्याय विभाग क्रमांक:- न्यायस्था ११२०/३७४/प्र.क्र.९०/का-११, दि.१७.०४.२०२३.
४) उच्च न्यायालय, मुंबई यांचे No:B(W)A-१२०२/२०१७/१०४०/२२०५,दि.२७.०४.२०२३
५) जिल्हा व सत्र न्यायालय, नाशिक यांचे जा.क्र./वित्त/डिडिओ/२५२९/२०२३,दि.२०.०४.२०२३.

**प्रस्तावना:-**

उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र.१ येथील दिनांक ०९.११.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये सिन्नर, जि.नाशिक येथे दिवाणी न्यायालय, वरिष्ठ स्तर हे न्यायालय स्थापन करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संदर्भाधीन अ.क्र.२ येथील दिनांक ०९.०१.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर न्यायालयाकरीता आवश्यक असणाऱ्या खर्चासाठी विधानमंडळाची मान्यता घेण्यात आली आहे. अ.क्र.३ येथील दिनांक १७.०४.२०२३ रोजीच्या अधिसूचनेन्वये दिनांक २२ एप्रिल,२०२३ पासून दिवाणी न्यायालय, वरिष्ठ स्तर, सिन्नर हे न्यायालय कार्यान्वित झाले आहे. संदर्भाधीन अ.क्र. ४ व ५ रोजीच्या पत्रान्वये मा.उच्च न्यायालय, मुंबई व जिल्हा व सत्र न्यायालय, नाशिक यांनी केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने दिवाणी न्यायाधीश, वरिष्ठ स्तर, सिन्नर, जि.नाशिक यांना कार्यालय प्रमुख व आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

जिल्हा व सत्र न्यायालय, नाशिक यांच्या अधिपत्याखालील दिवाणी न्यायालय, वरिष्ठ स्तर, सिन्नर, जि.नाशिक या न्यायालयासाठी दिवाणी न्यायाधीश, वरिष्ठ स्तर, सिन्नर, जि.नाशिक यांना "कार्यालय प्रमुख" तसेच "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर न्यायालयातील सर्व प्रकारची देयके कोषागारात सादर करण्याकरीता त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तीय बाबींपुरतेच मर्यादित राहतील.

२. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८,दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील भाग पहिला, उप विभाग, १ मधील अनुक्रमांक ३, नियम क्रमांक २ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार तसेच महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ मधील नियम १५(३) व १५६ अन्वये दिलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५०८१८०९१३९५१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2023.05.08 18:10:23 +05'30'

**( नि. वि. जिवने )**
विधि सल्लागार-नि-सह सचिव

**प्रत:-**

१) प्रबंधक (निरीक्षणे- १), उच्च न्यायालय, मुंबई.
२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जि.नाशिक.
३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा)महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) दिवाणी न्यायाधीश,वरिष्ठ स्तर, सिन्नर, जि.नाशिक.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, जि.नाशिक.
६) उप कोषागार अधिकारी,सिन्नर, जि.नाशिक.
७) कक्ष अधिकारी का.२३/२०,विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) कक्ष अधिकारी, कोषा (प्रशा-५)/विनियम/व्यय-५ , वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती.